**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सिंधुदुर्ग या संस्थेकरीता स्वीय प्रपंजी लेखा खाते (पी. एल. ए.) उघडण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पीएलए ०३२४/प्र.क्र.१६५/प्रशा-२**
९ वा मजला, गो. ते. रुग्णालय, संकुल, लोकमान्य टिळक मार्ग,
नवीन मंत्रालय, मुंबई ४०० ००१
तारीख : १८ जुलै, २०२४.

वाचा:-

१) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक : एमईडी-२०१६/प्र.क्र.२३१/१६/शिक्षण-१, दिनांक ०८.१२.२०२०.
२) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, शासन निर्णय क्रमांक : वैशिवि-२०२०/प्र.क्र.१६/प्रशा-२, दिनांक ०४.०३.२०२०.
३) वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, परिपत्रक क्र. वैशिवि-२०१८/प्र.क्र.२६३/प्रशा-२, दिनांक २७.०४.२०२३.
४) आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांचे पत्र क्र. संवैशिवसं/अर्थसंकल्प/रुग्णालयसिंधुदुर्ग /नविन स्वीय प्रपंजी खाते प्रस्ताव/३९०८/२४, दिनांक १५.०३.२०२४.
५) वरिष्ठ लेखा अधिकारी, महालेखाकार कार्यालय, महाराष्ट्र यांचे पत्र क्र. टीएम/सीएच-२/युओआर/वै. शि. औ. द्र. वि./युओआर क्र. ४५/२०२४-२५/३६६, दिनांक २४.०६.२०२४.

प्रस्तावना :-

शासनाच्या संदर्भ क्र. १ वरील दिनांक ०८.१२.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये सिंधुदुर्ग येथे १०० विद्यार्थी प्रवेश क्षमतेचे शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व त्यास संलग्नित ५०० खाटांचे रुग्णालय सुरु करण्यास मान्यता देण्यात आली आहे. सदर रुग्णालयात जमा होणारे रुग्ण नोंदणी शुल्क, एक्सरे, सी. टी. स्कॅन, एम. आर. आय., प्रयोगशाळा तपासणी शुल्क, रुग्णांकडून होणारे विविध चाचण्या, बाह्यरुग्ण नोंदणी शुल्क, व इतर रक्कमा भरणा करण्यासाठी तसेच त्यामधून अनुज्ञेय खर्च करण्याकरीता स्वीय प्रपंजी लेखा खाते उघडण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सिंधुदुर्ग या रुग्णालयात जमा होणारे रुग्ण नोंदणी शुल्क, एक्सरे, सी. टी. स्कॅन, एम. आर. आय., प्रयोगशाळा तपासणी शुल्क, रुग्णांकडून

होणारे विविध चाचण्या, बाह्यरुग्ण नोंदणी शुल्क व इतर रक्कमा भरणा करण्यासाठी त्यामधून अनुज्ञेय खर्च करण्याकरीता तसेच संदर्भ क्र. २ वरील दिनांक ०४.०३.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या बाबींसाठी खर्च करण्याकरीता शासन याद्वारे महाराष्ट्र कोषागार नियम, १९६८, खंड-१ मधील नियम ४९४ मधील तरतूदींनुसार अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सिंधुदुर्ग यांच्या नावे स्वीय प्रपंजी लेखा खाते (पी. एल. ए.) सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खात्यात जमा होणाऱ्या निधीचा विनियोग करतांना शासनाने वेळोवेळी ठरवून दिलेल्या मार्गदर्शक तत्वांचे व वित्तीय नियमांचे पालन करणे बंधनकारक राहील. तसेच महाराष्ट्र कोषागार नियमांमधील तरतूदींचे पालन करणे ही आवश्यक राहील.

३. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ तसेच त्यामध्ये वेळोवेळी होणाऱ्या सुधारणांनुसार विविध बाबींसाठी प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारांनुसार सदर खात्यातील रक्कम खर्च करावी.

४. या खात्यावर जमा व खर्चाच्या होणाऱ्या रक्कमांचा महालेखापाल कार्यालयासोबत मासिक/त्रैमासिक ताळमेळ घेण्याची जबाबदारी संबंधित संस्थेच्या आहरण व संवितरण अधिकारी यांची राहील. याबाबतचे सविस्तर तपशिलवार मासिक विवरणपत्र संस्थेमार्फत आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय यांना सादर करण्यात येईल. संचालनालयामार्फत याबाबतची तपासणी करुन त्रैमासिक अहवाल संचालनालयामार्फत शासनास सादर करण्यात येईल.

५. सदर खात्यावरील व्यवहार शासकीय/वित्तीय नियमांनुसार चालू असल्याबाबत शहानिशा करण्याची व सदर खात्यावर योग्य नियंत्रण ठेवण्याची जबाबदारी अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सिंधुदुर्ग यांची राहील.

६. सदर स्वीय प्रपंजी लेखा खात्यावर नियमित व्यवहार करणे आवश्यक आहे. तसेच सदर खाते व्यवहारा अभावी बंद होऊ नये याची जबाबदारी अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सिंधुदुर्ग यांची राहील.

७. सदर खात्यावर होणाऱ्या आर्थिक व्यवहारांचे नियमित लेखापरीक्षण करणे आवश्यक आहे.

८. उपरोक्त शासन निर्णय, वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्रमांक १२४/२०२४/को.प्र. ५, दिनांक १०.०५.२०२४ अन्वये व महालेखापाल, महाराष्ट्र, मुंबई-१ यांनी अनौपचारिक संदर्भ क्र. टीएम/सीएच-२/युओआर/वै. शि. औ. द्र. वि./युओआर क्र. ४५/२०२४-२५/३६६, दिनांक २४.०६.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१८१२१९१२३७१३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MAHADEO GIRDHARI JOGDAND

Digitally signed by MAHADEO GIRDHARI JOGDAND
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=0477d837dc0b00fc2cbd45d17d07c625c3417378f97d493a8a277faa29f65459, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C1D08CFDEE92DA209D709F5456D9EDE95236B8A8E7E2A2801B8FED03DCF793D3, cn=MAHADEO GIRDHARI JOGDAND
Date: 2024.07.18 14:56:15 +05'30'

**( म. गि. जोगदंड )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
३. संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई.
४. निवासी लेखाधिकारी, सिंधुदुर्ग .
५. अधिदान व लेखा अधिकारी, सिंधुदुर्ग .
६. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदुर्ग .
७. कक्ष अधिकारी (कोषा प्रशा-५), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, सिंधुदुर्ग .
९. निवडनस्ती (प्रशा-२)